विधि व न्याय विभागाच्या अधिपत्याखालील महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयातील बाहययंत्रणेद्वारे भरावयाच्या पदांबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधी व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एजीओ २२२२/प्र.क्र.८८/का.१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०९ जून, २०२३

**वाचा:-**

१) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्रमांकः एजीओ२२१६/प्र.क्र.३८/का.१, दिनांक १८.०४.२०२२
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः पदनि-२०२२/प्र.क्र. १५/आ.पु.क, दिनांक २७.०४.२०२२
३) वित्त विभाग, यांचे क्रमांकः पदनि-२०२३/प्र.क्र २२/आपुक, दिनांक २७.०४.२०२३ रोजीचे कार्यवृत्त

**प्रस्तावना :-**

विधि व न्याय विभागाच्या अधिपत्याखालील महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयातील १७ नियमित व ६ (५ + १) बाहययंत्रणेद्वारे भरावयाच्या पदांचा सुधारित आकृतीबंध दिनांक १८.०४.२०२२ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आला आहे. या शासन निर्णयान्वये महाप्रशासक आणि शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयातील वाहनचालक हा संवर्ग मृत ठरविला आहे. तथापि सदरहू कार्यालयातील कार्यरत एक वाहनचालक सेवानिवृत्त होणार असल्याने एका वाहनचालकाची आवश्यकता आहे. सबब, सदर कार्यालयासाठी एक वाहनचालक सेवा कायमस्वरुपी बाहययंत्रणेद्वारे घेण्यास उच्चस्तरीय सचिव समितीने मान्यता दिली आहे, त्यानुषंगाने दिनांक १८.०४.२०२२ च्या शासन निर्णयातील विवरणपत्र-ब मध्ये सुधारणा करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयाद्वारे उच्चस्तरीय सचिव समितीने दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने महाप्रशासक आणि शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयासाठी १ वाहनचालक सेवा कायमस्वरुपी बाहययंत्रणेद्वारे घेण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्यानुषंगाने या विभागाच्या शासन निर्णय दिनांक १८.०४.२०२२ मधील "विवरणपत्र ब" मध्ये आवश्यक त्या सुधारणा करुन सुधारित "विवरणपत्र ब" सोबत जोडले आहे.

२. बाहययंत्रणेद्वारे सेवा घेताना, वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक २७.४.२०२२ च्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्यात यावे. तसेच या संदर्भात शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील तरतूदींचे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३ मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीने दिनांक १७.०४.२०२३ च्या बैठकीमध्ये दिलेल्या मंजुरीनुसार तसेच वित्त विभागाच्याग अनौ. सं.क्र. २९२ /आपुक, दिनांक ०५.०६.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१२१११३७३६३२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANISHA ANIL KADAM

Digitally signed by MANISHA ANIL KADAM
DN: CN = MANISHA ANIL KADAM, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = LAW AND JUDICIARY DEPARTMENT
Date: 2023.06.12 11:38:09 +05'30'

**( मनिषा कदम )**
**सहायक सॉलिसिटर-नि- उप सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री (विधि व न्याय) यांचे खाजगी सचिव,
२. मा. राज्यमंत्री (विधि व न्याय) यांचे खाजगी सचिव,
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे सहसचिव/उपसचिव,
४. प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग यांचे स्वीय सहायक,
५. प्रधान सचिव व वरिष्ठ विधि सल्लागार, विधि व न्याय विभाग यांचे स्वीय सहायक,
६. महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. महालेखापाल-एक, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई.
८. महालेखापाल-दोन, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (२ प्रती)
११. सामान्य प्रशासन विभाग, का.१४, १४-अ, १४-ब
१२. वित्त विभाग / आपुक, वित्तीय सुधारणा
१३. विधि व न्याय विभाग, कार्या- १७,२३,२४, व २५
१४. निवडनस्ती (का.१).

# विवरणपत्र – ब

महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयातील मृत संवर्ग घोषित केलेल्या अधिसंख्य व बाहययंत्रणेमार्फत भरावयाच्या पदांचा तपशील

| अ.क्र. | पदनाम | मृत संवर्ग घोषित केलेल्या अधिसंख्य व बाहययंत्रणेमार्फत भरावयाच्या पदांची संख्या |
|---|---|---|
| १. | वाहनचालक | १ बाहययंत्रणेद्वारे |
| २. | दप्तरी (मृत संवर्ग) | १ |
| ३. | नाईक (मृत संवर्ग) | १ |
| ४. | शिपाई (मृत संवर्ग) | ३ + १ बाहययंत्रणेद्वारे |

MANISHA ANIL KADAM

Digitally signed by MANISHA ANIL KADAM
DN: CN = MANISHA ANIL KADAM, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = LAW AND JUDICIARY DEPARTMENT
Date: 2023.06.12 11:38:24 +05'30'

( मनिषा कदम )
सहायक सॉलिसिटर-नि- उपसचिव,
महाराष्ट्र शासन